शासनाकडे स्वाधीन केलेल्या सदनिकेचे/घराचे भाडे भरपाईबाबत.

## महाराष्ट्र शासन

### वित्त विभाग

शासन निर्णय क्रमांक सीपीए. १४९०/२६९/९०/सेवा-५

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १ डिसेंबर १९९०

पहा—(१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सीपीए. १४७९/१२९२ (एक)/एसईआर-५, दिनांक १४ सप्टेंबर १९७९.

(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सीपीए. १४८७/९९५/८७/सेवा-५, दिनांक ९ मे १९८८.

### शासन निर्णय

शासकीय कर्मचाऱ्यांनी शासनाकडे स्वाधीन केलेल्या सदनिकेची भाडे भरपाई ठरविण्याची सूत्रे शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सीपीए. १४७९/१२९२ (एक)/एसईआर-५, दिनांक १४ सप्टेंबर, १९७९ मध्ये विहित करण्यात आली असून त्यात शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सीपीए. १४८७/९९५/८७/सेवा-५, दिनांक ९ मे १९८८ अन्वये सुधारणा करण्यात आली आहे.

२. शासनाकडे स्वाधीन केलेल्या सदर सदनिकेची/घराची भाडे भरपाईची सूत्रे सुधारण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. या प्रश्नाचा काळजीपूर्वक विचार करून शासन असा आदेश देत आहे की, भांडवली गुंतवणुकीच्या परतीच्या घटकामध्ये एकदाच खालील-प्रमाणे वाढ करून भाडे भरपाईची सुधारित रक्कम प्रचलित सूत्रानुसार निश्चित करण्यात यावी :—

| | |
|---|---|
| (अ) दिनांक १ जानेवारी १९७० पूर्वी बांधलेल्या सदनिका/घरासाठी . . | भांडवली गुंतवणुकीच्या आधारे काढलेल्या परतीच्या रकमेवर ३० टक्के वाढ. |
| (ब) दिनांक १ जानेवारी १९७० आणि दिनांक ३१ डिसेंबर १९७९ च्या मधील कालावधीत बांधलेल्या सदनिका/घरासाठी. | भांडवली गुंतवणुकीच्या आधारे काढलेल्या परतीच्या रकमेवर २० टक्के वाढ. |
| (क) दिनांक १ जानेवारी १९८० आणि दिनांक ३१ मार्च १९८८ च्या मधील कालावधीत बांधलेल्या सदनिका/घरासाठी. | भांडवली गुंतवणुकीच्या आधारे काढलेल्या परतीच्या रकमेवर १० टक्के वाढ. |

ही वाढ दिनांक १ एप्रिल १९९१ पासून लागू होईल. मात्र या वाढीमुळे कोणत्याही आधीच्या कालावधीची थकबाकी देय असणार नाही.

३. शासन असेही आदेश देत आहे की,—

(१) दिनांक १ एप्रिल १९९१ पासून पुढील प्रत्येक ३ वर्षांनी आधारभूत रकमेत १५ टक्के वाढ देण्यात यावी. परंतु अशी सदनिका शासनाकडे सतत आधीची तीन वर्षे स्वाधीन असणे आवश्यक असेल म्हणजेच अशा प्रकारची वाढ दिनांक १ एप्रिल १९९१ पूर्वी पासून सतत शासनाच्या स्वाधीन असलेल्या सदनिका/घराकरिता प्रथम दिनांक १ एप्रिल १९९४ पासून देय ठरेल ;

(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सीपीए. १४८७/९९५/सेवा-५, दिनांक ९ मे १९८८ च्या परिच्छेद-३ मधील "क" मध्ये विहित करण्यात आलेले सूत्र एकचे (भरपाईची रक्कम सूत्र दोन अनुसार मर्यादित करण्यासंबंधीचे) परंतुक दिनांक १ एप्रिल १९९१ पासून रद्द समजण्यात यावे ;

(३) शासकीय अधिकाऱ्याची/कर्मचाऱ्याची सदनिका/घर स्वीकारताना त्या सदनिकेचे सार्वजनिक बांधकाम विभागाने तपशीलवार निरीक्षण करावे आणि त्या सदनिकेमधील सर्व फिक्सर्स, परिरक्षेची स्थिती, इत्यादी संदर्भात सद्य:स्थितीबद्दल सविस्तर नोंद घ्यावी. अशी सदनिका ज्या वेळेस संबंधित शासकीय कर्मचाऱ्याला त्याच्या स्वत:च्या वास्तव्यासाठी परत करण्यात येईल, त्या वेळेस सार्वजनिक बांधकाम विभागातर्फे ती सदनिका ज्या स्थितीमध्ये स्वीकारण्यात आली होती त्याच स्थितीमध्ये शासकीय खर्चाने आणून ती परत करण्यात यावी ; आणि

(४) एखाद्या शासकीय अधिकाऱ्याकडे/कर्मचाऱ्याकडे एकापेक्षा अधिक सदनिका/घरे या राज्यात असतील तर त्याला निवृत्तीनंतर त्यापैकी एक सदनिका/घर शासनाकडे स्वाधीन करण्याची सवलत अनुज्ञेय असावी. यासाठी भाडे भरपाईची देय रक्कम सूत्र दोन अनुसार (वरील सुधारणांसह) ठरविण्यात यावी.

४. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मंगला मं. कोरगावकर
शासनाचे उप सचिव, वित्त विभाग.

(शा.म.मु.) एच २३१४ (१२,०११—१२–९०)

प्रति,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयातील सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-५.

---

*पत्राने.